मनुष्याने जीवनाची भिन्न भिन्न रूपे पाहिलेली आहेत, जीवन जगण्याचे प्रकार व पध्दती त्याने आजवर बऱ्याचवेळा बदलेल्या आहेत, कधी त्याने दगडांच्या गुहा मध्ये निवास केला आणि तर कधी झाडांच्या आवरणा पासून बनविलेल्या घरांमध्ये निवास केला, तर कधी घोडाघाडी चालवून जीवनाला गती दिली, तर कधी विमान आणि रॉकेटचा शोध लावून आपले जीवन अत्यआधुनिक व गतीमान केले .

आजपर्यंतच्या जीवनाच्या या चक्रामध्ये ज्या गोष्टीला त्याने कधीच विरोध केला नाही आणि करूही शकला नाही ती गोष्ट म्हणजे या जीवनाची समाप्ती म्हणजेच मृत्यु होय, प्रत्येक व्यक्ती या गोष्टी संर्दभात आगदी चांगल्या प्रकारे परीचित आहे की त्याचा मृत्यु निश्चित आहे परंतू या मृत्युनंतर देखिल जीवन आहे का? हा एक असा प्रश्न आहे की जो रहस्यमय तर आहेच परंतू त्याच बरोबर मावनजाती मध्ये संभ्रम देखील निर्माण करणारा आहे .

## १. मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवणे मानवजातीसाठी गरजेचे आहे

मृत्युनंतरचे जीवन हा मानवाच्या जीवनाचा एक अविभाज्य घटक आहे, म्हणजेच एखाद्या व्यक्तीचा जर मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास नाही . तर तो आपल्या निर्माणकर्त्याचा अज्ञाधारक व्यक्ती असूच शकत नाही, एक अज्ञाधारक व्यक्ती असे मानतो की हे जीवन त्याला मोफत मिळाले आहे . या जीवनामध्ये त्याने केलेल्या कर्मा चा मोबदला त्याला मृत्युनंतरच्या जीवनात त्याच्या निर्मा णकर्त्याकडून मिळणार आहे, जेवढे चांगले व मोठे कर्म असेल तेवढा त्याला मोबदला व इनाम मोठा मिळेल, आणि दुष्टकर्म जेवढे वाईट तेवढा त्याचा दंड देखील वाईट व यातनादायक असेल .

## २ . मृत्युनंतरच्या जीवना बद्दल असलेला संभ्रम

लोक मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाही, खरे पाहता खऱ्या निर्माणकर्त्याचा अज्ञाधारक मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवतो व त्याच प्रमाणे इस्लामने देखील मृत्युनंतरच्या जीवनाचा सिध्दांत लोकांसमोर मांडला, तेव्हां देखील लोकांनी हाच संशय उपस्थित केला की आम्ही तर हेच पाहिले आहे की मृत्यूनंतर तर मनुष्याची हडे व मांस सडून जिर्ण होऊन नष्ट होतात, आणि काही लोक असेही म्हणतात की मेले म्हणजे गेले, मृत्युनंतरचे मिळणारे जीवन कोणी पाहिले आहे, म्हणजेच ज्या शरीराला किडया मुंग्यांनी खाऊन टाकले, तर कधी कोण्या मनुष्याचा संहार कोण्या प्राण्याने म्हणजेच जसे की वाघ, चिता यांनी केला आणि त्याचे मांस खाऊन पचऊन टाकले तर काय असा व्यक्ती परत येईल का? असे अनेक प्रश्न लोकांच्या मनात येतात .

लोक निर्माणकर्त्याला मानतात परंतू वरील त्यांची ही शंका हे दर्शवते की त्या लोकांनी सृष्टी निर्माणकर्त्याला ओळखण्या मध्ये फार मोठी चूक केली आहे, ज्याने या सृष्टीला निर्माण केले व त्यानेच हे मांसाहारी जनावरे म्हणजेच वाघ, सिंह, किडा, मुंगी व इतर जीव देखील बनविले हा तर त्याचाच नियम आहे की काही प्राणी मांसहारी असतील तर काही प्राणी शाकाहारी असतील, आणि जर त्या निर्माणकर्त्याने इच्छिले असते तर शाकाहरी मांसाहारी झाले आसते आणि मांसाहारी शाकाहारी झाले असते, आणि असे निश्चितपणे झाले असते असे यासाठी की ज्याने यांना निर्माण केले तो निमाणकर्ता हे काम करण्यासाठी सक्षम आहे कारण तो खरोखर निर्माणकर्ता व पालनकर्तादेखिल आहे आणि त्याचा नियत्रंणा बाहेर कोणतीही गोष्ट नाही म्हणुनच त्याचे या गोष्टीवर सुध्दा नियत्रंण आहे की ज्या प्राण्यांनी मनुष्याचा संहार करून त्यांना नष्ट केले आहे, ज्या

आगिने मनुष्यास जाळून खाक केले अशा मनुष्यास पुन्हा निर्माण करावे .

म्हणुनच आमचा निर्माणकर्ता तो आहे ज्याच्या नियत्रंणामध्ये प्रत्येक गोष्ट आहे, हिच गोष्ट मनुष्याला समजविण्यासाठी अल्लाहने कुरआनमध्ये सांगितले आहे की,

**"नि :संशय अल्लाह प्रत्येक गोष्टीवर सामर्थ्य राखतो ." (सुरह बकरा, आयत नं . २०)**

# मृत्युनंतरच्या जीवनाच्या शंकांवर कुरआनाचे उत्तर

## १ . मनुष्याला सर्वप्रथम जीवन कोणी दिले?

मनुष्य जन्माला येण्या अगोदर काय होता आणि कोठे होता, जन्माच्या अगोदर त्याचे काहीच अस्तित्व नव्हते, ना ही त्याचे मांस किंवा हडे अस्तित्वात होती, आणि या गोष्टींचा उपस्थित असण्याचा काही प्रश्नच निर्माण होत नाही, निर्माणकर्त्याने जेव्हां मनुष्याला जीवन दिले त्या आगोदर तो काहीच नव्हता, मृत्युनंतर मनुष्याचे मांस सर्वप्रथम नष्ट होते परंतू काही प्रमाणात हडे मात्र बाकी राहतात किंवा राख तरी शिल्लक राहते अर्थात प्रश्न हा आहे की ज्या निर्माणकर्त्याने सजीवाला त्याच्या कोणत्याही अस्तित्वा शिवाय बनविले व जीवन दिले तर काय मृत्युनंतर त्याचा काही तरी नमुना शिल्लक असताना मंग काय त्यापासून त्याल पुन्हा जीवन नाही देऊ शकत? सर्वप्रथम जेव्हां मनुष्याला निर्माण केले तेव्हां कोणत्याही नमुण्याशिवाय निर्माण केले तर काही नसताना निर्माण करने कठिण आहे की मृत्युनंतर काही तरी नमुना शिल्लक असल्यानंतर निर्माण करने कठिण आहे? म्हणुनच आमच्या निर्माणकर्त्याने या बाबतीत मनुष्याच्या मार्गदर्शना करीता निशाणी म्हणुन खालील कुरआनाच्या आयाती आकाशातून उतरविल्या जसे की,

"आणि तोच आहे (म्हणजेच अल्लाह) ज्याने पहिल्यांदा जीवन दिले आणि तोच पुन्हा जीवन देईल, आणि पुन्हा जीवन देणे (पहिल्यांदा जीवन देण्यापेक्षाही जास्त) सोपे आहे." (सुरह रोम, आयत नं. २७)

"ज्या प्रमाणे आम्ही (म्हणजेच अल्लाहने) यांना (म्हणजेच मनुष्यांना) सर्वप्रथम निर्माण केले, त्याचप्रमाणे त्यांना पुन्हा दुसऱ्यांदा निर्माण करू, हे आमचे वचन आहे, आम्ही निश्चीतपणे असे करणारेच आहोत." (सुरह अम्बिया, आयत नं. १०४)

"आणि मुश्रिक म्हणतात की जेव्हा आम्ही (मरण पावल्या नंतर हाडे) जीर्ण होऊन जाऊ तेव्हा काय नव्याने पुन्हा निर्माण केले जाऊ. (हे पैगंबर) तुम्ही सांगून टाका की (हा, असेच होणार आहे) मग तुम्ही दगड बना किंवा लोखंड. नाहीतर आणखी कोणतीही निमीर्ती जी तुमच्याजवळ मोठी असेल (ती बना), तेव्हा ते विचारतील की आम्हाला दुसऱ्यांदा कोण जिंवत करणार? तुम्ही सांगून टाका, की तोच (अल्लाह) ज्याने तुम्हाला सर्वप्रथम निर्माण केले आहे." (सुरह इस्रा, आयात नं. ४९ ते ५१)

म्हणुनच जो व्यक्ती मृत्युनंतरच्या जीवनाचा विरोध करतो किवां त्याच्यावर विश्वास ठेवत नाही तर तो असा आहे जसे तो स्वतःच्या पहिल्या जीवनाला विसरला आहे. अशा लोकांच्या मार्गदर्शनासाठी निशानी म्हणुन व पुरावा म्हणुन खालील कुरआनातील आयाती आहेतः

"काय मनुष्य लक्ष देत नाही की आम्ही (म्हणजेच अल्लाहने) त्याला वीर्यापासून निर्माण केले आहे आणि नंतर तो उघडपणे भांडखोर बनला. आणि आमच्यासाठी उदाहरण देतो परंतू स्वतःच्या निमीर्तीच्या सत्याला तो विसरला, व म्हणतो की ही हाडे जीर्ण व सडून

गेल्या नंतर पुन्हा त्यांना कोण जिंवत करणार आहे? (हे पैगंबर) तुम्ही त्यांना सांगा की तो अल्लाह त्यांना जिवंत करेल ज्याने त्यांना पहिल्या वेळेस निर्माण केले होते, आणि तो (अल्लाह) आपल्या संपूर्ण निमीर्ती बद्दल पूर्ण पणे ज्ञान ठेवणारा आहे." (सुरह यासीन, आयात नं. ७७ ते ७९)

## २. सृष्टीकर्त्याने अशा काही गोष्टींची निर्मिती केली की जी मानव निर्मितीच्या तुलनेने कितीतरी पटीने विशाल आहे

सृष्टीकर्त्याने अशा काही गोष्टींची निर्मिती केली ज्या निर्मितीला निर्माण करने मनुष्याच्या निर्मितीपेक्षा जास्त कठिण आहे, जेव्हां निर्माणकर्त्याने कित्येकपटीने विशाल असलेल्या निर्मितीला निर्माण केले तर मग काय मनुष्याला पुन्हा निर्माण करणे कठिण आहे काय?

म्हणुनच या बद्दल कुरआनमध्ये सांगितले आहे की,

"निश्चितपणे आकाशांची आणि जमीनीची निर्मीती मनुष्याच्या निर्मीतीपेक्षा जास्त मोठे काम आहे परंतू अधिकांश लोक या गोष्टीला जाणत नाही." (सुरह ग़ाफ़िऱ, आयत नं. ५७ )

"काय तो अल्लाह ज्याने आकाशांना आणि जमीनीला निर्माण केले आहे तो या गोष्टीवर सामर्थ्य नाही राखत की तो यांच्यासारख्या मनुष्यांना पुन्हा निर्माण करेल, होय (निश्चितपणे तो अल्लाह यावर सामर्थ्य राखणारा आहे) आणि तो सर्वकाही निर्माण करणारा, सर्वकाही जाणणारा आहे." (सुरह यासीन, आयत नं.८१)

"काय त्यांनी हे पाहीले नाही की ज्या अल्लाहने आकाशांना आणि जमीनीला निर्माण केले आहे. आणि यांच्या निर्मीतीपासून तो थकलेला नाही. तो या गोष्टीवर सामर्थ्य राखतो की मरण पावलेल्यांना पुन्हा जिवंत

**करावे, का नाही, तो (अल्लाह) निश्चितपणे प्रत्येक गोष्टीवर सामर्थ्य राखणारा आहे."** (सुरह अहक़ाफ, आयत नं ३३)

वरील आयातींचे तात्पर्य हेच आहे की अल्लाहने मनुष्याला समजविण्यासाठी कुरआनमध्ये निशाण्या म्हणुन आयाती अवतरीत केल्या आहेत जेणेकरून मनुष्याने हे जाणून घ्यावे की अल्लाहच त्याचा निर्माता आहे व त्याच्या व्यतरिक्त इतर अनेक मोठया गोष्टी आहेत त्या सर्व एकटया अल्लाहने निर्माण केल्या आहेत तर काय मृत्यु नंतर पुन्हा मनुष्याला जिंवत करणे त्याच्यासाठी अवघड असेल?

## ३. मृत धरती मध्ये नवजीवन

जेव्हां पावसाचा वर्षाव होतो. आणि पडिक व मृत जमीनीला नवजीवन मिळते ती आपल्या मधून पिकांची निर्मिती करण्याचे काम सुरू करते व तिच्या मध्ये रंगबिरंगे नवनविन फूले येतात. त्याच बरोबर धान्याची देखील निर्मिती होते. याच मुळे जमीनीचा प्रत्येक भाग हा सजीव व टवटवित दिसून येतो. प्रत्येक प्राण्या मध्ये जीवन जगण्याची एक आशा असते. म्हणुनच ज्या प्रमाणे या निर्जीव व पडिक जमीनीला मृत्युनंतर देखील निर्माणकर्ता नवजीवन देतो. तर काय तो निर्माणकर्ता मनुष्याला मृत्युनंतर पुन्हा जीवन नाही देऊ शकत का?

**"आणि त्याच्याच (म्हणजेच अल्लाहच्या) निशाण्यामधून आहे की तुम्ही जमीनीला मृत व पडीक पहाता, मंग जेव्हा आम्ही तिच्यावर पाऊस पाडतो तेव्हा ती हिरवी टवटवीत होवून वाढीस लागते. ज्याने तीला जिवंत केले तोच मरण पावलेल्यांना देखील जीवन देईल, तो प्रत्येक गोष्ट करण्यास सर्मथ आहे."** (फुस्सिलतः 39)

“तोच जमिनीला तिच्या मृत्यूनंतर जिंवत करतो. अशाच प्रकारे तुम्ही (देखील) बाहेर काढले जाल.” (रोमः 19)

“आणि तोच आहे जो आपल्या कृपेच्या (पाऊसाच्या) अगोदर चांगली बातमी देणारे वारे पाठवितो, येथेपर्यंत जेव्हां ते वारे पाऊसाने भरलेल्या ढगांना घेऊन येतात तेव्हां आम्ही त्यांना मरण पावलेल्या धरतीकडे हाकतो, त्यांच्यापासून पाण्याचा वर्षाव करतो, त्या पाण्याने आम्ही प्रत्येक प्रकाराच्या फळांना उगवितो, याच प्रकारे आम्ही मरण पावलेल्यांनाही जिवंत करणार, म्हणजेच तुम्ही बोध घ्यावा.” (आराफः 57)

## ४. काही लोकांना तर या जगामध्येच पुर्न जीवन मिळाले आहे

काही मनुष्यांना अल्लाहने मृत्युनंतर जीवन दिले आहे, जेव्हां या लोकांना अल्लाहने मृत्युनंतर जीवन दिले तर काय संपूर्ण मावनजातीला मृत्युनंतर जीवन का नाही देणार?

“(हे यहुदींनो) आणि ती वेळही आठवा जेव्हा तुम्ही एका जीवाची हत्या केली, मंग तुम्ही (हत्यारा कोण आहे याबाबत) मतभेद करू लागले, आणि अल्लाह ते जाहिर करणार होता ज्याला तुम्ही लपवित होते, यासाठी आम्ही (म्हणजेच अल्लाहने)सांगितले त्याच्या(त्या गाईचा) एक टुकडा त्या मृत शरीरावर मारा (असे केल्याने तो जिवंत झाला आणि सांगितले की कोणी त्याची हत्या केली आहे), याचप्रमाणे अल्लाह मरण पावलेल्यांना जिंवत करेल, आणि तुम्हाला आपल्या निशाण्या दाखवेल, म्हणजेच तुम्ही समजावे.” (बक़राः ७२व ७३)

“काय आपण (हे पैगंबर) त्यांना नाही पाहिले जे मृत्युच्या भितीने हजारोच्या संख्येने आपल्या घरातून

बाहेर पडले, अल्लाहने त्यांना सांगितले मरा (आणि ते मेले) मंग अल्लाहने त्यांना पुन्हा जिवंत केले ." (बकराः २४३)

"किंवा त्या माणसा प्रमाणे जो एका वस्तीवरून जात होता, जी (वस्ती) छतासकट उलटी पडली होती तो म्हणू लागला अल्लाह कसे या वस्तीला मृत्युनंतर पुन्हा जीवन देईल? अल्लाहने त्याला शंभर वर्ष मृत आवस्थेत ठेवले आणि मंग पुन्हा जीवन दिले, आणि त्याला विचारले तू किती दिवस या आवस्थेत होता? त्याने उत्तर दिले एक दिवस किंवा दिवसाचा काही भाग, अल्लाह ने म्हटलेः किंबाहुना तू शंभर वर्ष या आवस्थेत होता, आपल्या खाण्या पिण्याच्या वस्तूंकडे पाहा, त्या सडलेल्या नाहीत आणि तुझ्या गाढवाला पाहा, आणि आम्ही तुला लोकांसाठी निशाणी बनवू, त्या हाडांना पाहा, आम्ही त्यांना कशा प्रकारे जोडतो, मंग त्यांच्यावर मास चढवितो, जेव्हां त्याच्यावर हे स्पष्ट झाले, तो म्हणू लागला, मी जाणतो की अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे ." (बकराः २५९)

कुरआन मध्ये या घटनांना अशासाठी सांगितले आहे की या घटना यहूदी आणि ईसाई लोकांमध्ये प्रसिध्द होत्या, या घटनांना ते जाणत होते, जेव्हां या घटना घडल्या आणि या जगात मृत्युनंतर पुन्हा जीवन मिळत असताना पाहिले गेले तेव्हा काय पुन्हा मृत्युनंतरच्या जीवनाचा विरोध केला जाऊ शकतो का?

## ५. सतकर्म करणाऱ्या लोकांना सतकर्माचा आणि दुष्टकर्म करणाऱ्यांना दुष्टकर्माचा बदला कोठे मिळेल?

या संसारमध्ये चांगले लोक देखील आहेत त्याचबरोबर दुष्ट आणि पापी लोक सुध्दा आहेत, जर मृत्युनंतर कोणतेही जीवन नाही तर सतकर्म करणाऱ्या

लोकांना सतकर्माचा पुरस्कार आणि दुष्टकर्म करणाऱ्यांना दुष्टकर्माचा दंड व शिक्षा–यातना कोठे मिळतील ? आणि जेव्हां एक अत्याचारी अत्याचार करतो बरेच काही लोक त्याच्या अत्याचाराला वैतागलेले असतात परंतू त्याच्या भितीने ते त्याच्या विरूध्द उभे राहत नाही, आणि तो अत्याचारी अगदी निर्भयपणाने फिरत असतो, परंतू त्याला थांबविण्यासाठी कोणीही पुढे येत नाही . आणि जर का कधी तो आपल्या गुन्हयामुळे पकडला जातो तर तेव्हां तो आपला पैसा आणि सत्तेच्या बळावर सर्व पुरावे व साक्षिदारांना असे गायब करतो की तो मिळणाऱ्या दंडा व शिक्षापासून वाचतो, आता जरा तुम्ही विचार करा या अत्याचारीला या जगात हे सर्व लोक मिळून शिक्षा देऊ शकले नाही तर याला शिक्षा कोण देणार? जर मृत्युनंतर जीवन नाही तर या अत्याचारीचे काय होणार आणि ज्यांच्यावर अत्याचार झाला त्यांना न्याय कोठून मिळणार व कोण देणार? आणि त्या अत्याचारीला त्याच्या पापाची शिक्षा मिळणार आहे का नाही?हा एक प्रश्नच आहे .

कधी एक अत्याचारी अत्याचार तर करतो हे सगळयांना माहिती असते परंतू न्यायालय त्याला बाइज्जत सोडून देण्याचा आदेश देतो यामुळे की त्याला शिक्षा देण्यासाठी कोणताही आधार व पुरावा त्यावेळी अस्तित्वात नसतो परंतू लोकांना हे माहिती असते की याने पाप केले आहे, व हा गुन्हेगार आहे, परंतू पुरावा नष्ट केल्याने त्या गुन्हेगाराला काहीही होत नाही आता जरा तुम्हीच सांगा जर मृत्युनंतर जीवन नाही तर या सारख्या अत्याचारींना त्यांच्या पापाची शिक्षा कोठे मिळेल?

कधी तर कोठे कोठे अत्याचार होत असतो परंतू त्याचा कोणालाही ठावठीकाणा लागत नाही, असे यासाठी होते की ज्याच्यावर अत्याचार होत असतो तो या समाजाच्या भयाने किंवा इतर कोणत्याही कारणास्तव त्या

अत्याचाराचा गुन्हयाचा रिपोर्ट दाखल करीत नाही याचा परिणाम असा होतो की त्या पापाची व अत्याचाराचा थांगपत्ता इतर कोणालाही लागत नाही जरा विचार करा असे कितीतरी अत्याचार असतील जे जगा समोर येतच नाही, आता तुम्हीच सांगा या अत्याचारांचे व पापांचे काय करायचे? आणि ती कोणती जागा आहे जेथे अशा लोकांना शिक्षा मिळेल व अन्याला बळी पडलेल्या लोकांना न्याय मिळेल?

कधी असे होते की गुन्हयाची माहिती तर असते परंतु गुन्हेगार कधीच पकडला जात नाही कारण की गुन्हेगार कोण आहे हेच माहिती नसते अशा कितीतरी केसेस आहेत ज्याचे गुन्हेगार महितीच नाही याचे सर्वात उत्तम उदाहरण म्हणजेच zodiac killer होय ज्याने अनेकांची हत्या केली परंतू आज पर्यंत या गोष्टीचा शोध लागू शकला नाही की खुनी कोण आहे, आता जरा तुम्हीच सांगा की या पापी लोकांना त्यांच्या पापांची शिक्षा कोण देणार? जर मृत्युनंतर जीवन नाहीच तर हे सगळे दुष्टकर्मक करणारे लोक कायमस्वरूपी वाचले जर असे झाले तर न्याय कोठे मिळाला?

आता जरा दुसऱ्या गोष्टीकडे घेऊन जाऊ इच्छितो, असे मानले गुन्हेगार पकडला गेला परंतू त्याने ऐवढे गुन्हे केले आहेत की त्याच्या पापाचा घडा एवढा भरून गेला आहे की त्याच्या मुकाबल्यात जगातील सर्व शिक्षा त्याला देणे कमी आहेत उदाहरण, समजा एका मनुष्याने अनेक खून केलेत तर तुम्ही त्याला काय शिक्षा देणार, जास्तीत जास्त तुम्ही त्याला मृत्यु दंडाची शिक्षा देणार परंतू ही शिक्षा त्याला तर फक्त एका खूनाची आहे आणि या एकाव्यतरीक्त जे अनेक खून केले त्या इतर खूनांच्या शिक्षे बद्दल काय? जसे की एक उदाहरण आपण येथे घेऊ या, जसे दुसऱ्या महायुध्दामध्ये जवळ जवळ ६ करोड लोक मारले गेले जर तुम्ही मृत्युमुखी

पडलेल्या लोकांचा जवाबदार म्हणुन “हिटलर” ला ठरविले तर त्याला तुम्ही काय शिक्षा देणार?

याचमुळे ही सत्य परिस्तिथी तुम्हाला मानलीच पाहिजे की अशा पापी लोकांना जे अनेक लोकांचे खूनी आहेत यांना शिक्षा देणे मनुष्याच्या नियंत्रणा मध्ये नाही आणि मनुष्याकडे यासाठी कोणतीही व्यवस्था नाही, परंतू या पापी लोकांना शिक्षा देण्याची शक्ती निर्माणकर्त्याकडे आहेः

**“जेव्हां जेव्हां त्यांची (म्हणजेच नर्कवासीयांची) त्वचा जळून जाईल आम्ही लगेच तिच्या जागी दुसरी त्वचा बदलून देऊ यासाठी की त्यांनी यातनांची मजा चाखावी, नक्किच अल्लाह जबरदस्त, हिक्मतवाला आहे.”** (निसाः 56)

आणि राहिली त्या लोकांची गोष्ट जे या जगात पैशाच्या जोरावर लोकांवरती अन्याय करतात आणि शिक्षेपासून वाचतात परंतू मृत्युनंतर त्यांना कोणत्या गोष्टी वाचवतील? खरे पाहता त्यांचा पैसा तिथे काहीच उपयोगी पडणार नाही, आणि ना ही ते कोणत्याही प्रकारची हेराफेरी करू शकतील, त्या लोकांना सुध्दा आपल्या पापकर्मांचा हिशोब दयावा लागेल ज्यांचे पापकर्म या जगातील लोकांना कधीच माहिति पडले नाही.

**“आणि त्यांच्या कर्मांची पुस्तके ठेवली जाईल, आपण बघाल की दुराचारी त्या पुस्तकापासून घाबरलेले आसणार (कारण त्या पुस्तकामध्ये त्यांचे पापांची तपशील असतील), आणि म्हणू लागणार, आमचा विनाश, हे कसले पुस्तक आहे ज्याने आमचे ना छोटे पाप सोडले ना मोठे, सर्वांना मोजून घेतले (लिहले), आणि जे काही कर्म त्यांनी केले ते सर्व त्यांना दिसून येईल आणि तुमचा पालनकर्ता कोणावरही आत्याचार करीत नाही.”** (कहफ़ः 49)

**“ज्याने कणभर देखील काही सतकर्म केले असेल तर तो त्याला पाहील व ज्याने कणभर देखील काही दुष्टकर्म केले असेल तो त्याला पाहील .” (ज़लज़लाः 7-8)**

आणि राहिली गोष्ट साक्षिदारांची तर निर्माणकर्त्याच्या समोर मनुष्याच्या दुष्टकर्मांची साक्ष स्वःता त्या मनुष्याचे हाथ आणि पाय व त्याच प्रमाणे इतर अवयव देतील येथेपर्यंत त्याची त्वाचा देखील त्याच्या विरूध्द साक्ष देइल .

**“आज आम्ही त्यांच्या तोडांवर मोहर लावणार, आणि जे दुष्टकर्म ते करीत होते त्याच्या विषयी त्यांचे हात आमच्याशी बोलू लागतील व त्यांचे पाय साक्ष देतील . (यासीनः 65)**

**“आणि ते आपल्या त्वचांना म्हणतील, तुम्ही आमच्या विरूध्द साक्ष का दिली? ते उत्तर देतील की आम्हाला त्या अल्लाहने बोलण्याचे सामर्थ्य प्रदान केले, ज्याने प्रत्येक वस्तूला बोलण्याचे सामर्थ्य प्रदान केले आहे .” (फुस्सिलतः 21)**

ज्या लोकांवर अत्याचार होतो त्यांच्या मनात ही गोष्ट असते व या गोष्टीला ते मानतात देखील की मृत्युनंतर या अत्याचारी बरोबर आमच्या सर्व अत्याचारांचा बदला घेतला जाईल

## मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवण्याचे फायदे

मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवण्यामध्येच मानवजातीचे हित आहे, जीवन जगण्यासाठी या सत्याला कबूल केल्याशिवाय काहीही पर्याय नाही, नाहीतर जीवन लक्ष्यहीन बनून जाईल आणि लक्ष्यहीन जीवन उध्वस्त होण्यासाठी वेळ लागणार नाही, मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवण्यामध्ये मानवाला अनेक फायदे आहे जसे कीः

## १. एका चांगल्या समाजाची निर्मिती

एका चांगल्या समाजाच्या निर्मितीसाठी त्या समाजाच्या लोकांचे चांगले होणे फार गरजेचे आहे आणि चांगले म्हणजे सदाचारी लोक ते आहेत जे वाईट कामापासून स्वःताला वाचवितात, मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास आणि या जीवनात केलेल्या कर्मांचा हिशोब दयावयाचा आहे, हा विश्वास एका मनुष्याला वाईटकर्म करण्यापासून दूर ठेवतो आणि जर प्रत्येक मनुष्य मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवेल तर असे सर्व लोक मिळून एक समाज बनेल आणि तो चांगला व शक्तीशाली समाज असेल .

## मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास न ठेवणारे लोक सुध्दा वाईट काम करीत नाही

मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास न ठेवणारे लोक सुध्दा वाईट काम करीत नाही त्याचे कारण फक्त समाज आहे म्हणजेच हे लोक विचार करतात की जर त्यांनी वाईट काम केले तर समाज त्यांची इज्जत करणार नाही,आणि समाजाचे विचार त्यांच्या विषयी चांगले नसतील म्हणुनच का ते वाईट काम करण्यापासून स्वःताला वाचवितात, परंतू जर का या लोकांना हे माहिती पडेल की त्यांनी केलेले वाईट कर्म लोकांच्या समोर येणारच नाही आणि त्यांची इज्जत सुध्दा बाकी राहिल तर ते लोक वाईट काम करण्यासाठी बिल्कूल सुध्दा मागे हटणार नाही, यासाठी की त्यांच्या मनामध्ये जी समाजाची भीती होती ती नष्ट झाली .

## लोक वाईट काम का करतात?

काय असे अवश्यक आहे की एक मनुष्य समाजाच्या भितीमुळे वाईट कामापासून स्वःताला थांबवितो असे सुध्दा होऊ शकते की त्या मनुष्याला समाजाच्या

विचारांचा काहीच फरक पडत नाही, तरी सुध्दा तो वाईट काम करीत नाही .

होय, असे आवश्यक नाही, परंतू मनुष्याची मानसिकता अशी आहे की त्याला दुष्टकर्माचे आकर्षण असते याचमुळे तुम्ही पाहता की असे दुष्टकर्म करण्यासाठी काही लोक परदेशामध्ये जातात, खरे पाहता त्यांचे व्यक्तीमत्व लोकांसमोर जेथे ते राहतात तेथे फार चांगले असते, असे का होते? यासाठी की मनुष्यामध्ये दुष्टकर्म करण्याची चेतना असते, जेव्हां तो आपल्या समाजामध्ये असतो तेव्हां समाजाच्या भितीमुळे तो आपल्या वाईट इच्छा आकांक्षावर नियंत्रण ठेवतो परंतू जेव्हां तो अशा ठिकाणी जातो जेथे त्याला कोणीही सुध्दा ओळखत नाही, तसेच त्याच्या वाईटकर्मामुळे तेथे कोणाला कसलाही फरक पडत नाही अशामुळे त्याला वाईट काम करण्यासाठी कोणत्याही प्रकारचा अडथळा येत नाही . राहिली गोष्ट त्या लोकांची जे समाजाच्या भितीमुळे नाही तर खरोखरच ते सतकर्मी असतात आणि त्यांचे कार्य समाजाला माहिती असावे किंवा नसावे अशा कोणत्याही परस्थितीमध्ये ते चांगले कर्म करीत असतात परंतू असे लोक फक्त बोंटावर मोजण्या इतकेच आहेत आणि आम्ही अशा काही लोकांबद्दल येथे बोलत नाही परंतू आम्ही सर्वसामान्य मनुष्याविषयी चर्चा करीत आहोत .

मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास न ठेवणाऱ्या व मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांचे वाईट कामांपासून थांबणे या दोन्ही प्रकारच्या लोकांमध्ये मोठा फरक आहे

जर एक मनुष्य मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवतो आणि तो हे सुध्दा मानतो की या विश्वामध्ये जे काही घडत आहे व तो जे काही कार्य करत आहे त्याला त्याचा निर्माणकर्ता पाहत आहे आणि या जगातील

जीवनानंतर देखील त्याला जीवन मिळणार आहे त्यामध्ये त्याला त्याच्या कर्मांचा हिशोब दयावयाचा आहे हाच विश्वास त्याला वाईट कर्मांपासून वेळोवेळी थांबवितो . या मनुष्यामध्ये आणि त्या मनुष्यामध्ये जो समाजाच्या भितीने वाईट काम करीत नाही . या दोघांमध्ये फार मोठा फरक आहे . तो असा की ज्याला समाजाचे भय आहे व हे भय काही कारणाने जर राहिले नाही तर तो मनुष्य वाईट काम करण्यासाठी जरा सुध्दा घाबरणार नाही, परंतू सृष्टीकर्त्याचे भय व मृत्युनंतरच्या जीवनामध्ये या जगातील आपल्या केलेल्या कर्माचा हिशोब देण्याचे भय कधीही समाप्त होत नाही . हे असे भय आहे की त्या मनुष्याला वाईट कामांपासून वेळोवेळी वाचवित असते वाईटकर्म करते वेळी त्याला समाजातील कोणीही पाहत नसते . किंवा त्याची माहीती सुध्दा इतरांना मिळणार नाही . परंतू असे असून देखील त्याला माहीती असते की त्याचा निर्माणकर्ता त्याला पाहत आहे आणि त्याच्या प्रत्येक कर्माचा हिशोब ठेवला जात आहे, निर्माणकर्त्यापासून अशी कोणतीही गोष्ट नाही . जी लपवून राहिलेली आहे, त्याला प्रत्येक गोष्ट माहित असते म्हणूनच याच विश्वासाने तो मनुष्य वाईट कार्मापासून थांबतो .

समजा की एका दुकानदाराकडून आपण १६00 रूपयाची खरेदी केली व त्या बदल्यात तुम्ही २000 रूपयाची नोट दिली खरे पाहता दुकानदाराने तुम्हाला ४00 रूपये परत दयाला पाहिजे परंतू त्याने चुकून ५00 रूपयाची नोट दिली म्हणजे चुकून तुम्हाला १00 रूपये तुम्हाला जास्त दिले, आणि समजा दुकानदाराला त्याची ही चूक कधीच समजणार नाही आणि ना ही त्याच्या लक्षात कधी येईल, आता तो व्यक्ती जो मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाही व वाईटकर्म समाजाच्या भितीपोटी नव्हे तर सतकर्मी व्यक्तीमत्वामुळे करीत नाही असे होऊ शकते तर तो हे १00 रूपये स्वःताला ठेव

शकतो, पण जो व्यक्ती विश्वास ठेवतो की त्याचे कोणतेही कार्य सृष्टीकर्त्यापासून लपलेले नाही तर हे १00 रूपये तो स्वःलाच ठेवण्या अगोदर दहा वेळा विचार करेल की जर हे १00 रूपये आज त्याने स्वःताकडेच ठेवले तर उदया मृत्युनंतर या कर्माचा म्हणजेच या १00 रूपयाचा हिशोब त्याला दयावा लागणार आहे, आणि हेच भय त्याला ते १00 रूपये दुकानदाराला परत देण्यास भाग पाडेल .

## २ . चांगले कर्म करण्यासाठी प्रेरणा

जर एक मनुष्य "मृत्युनंतरच्या जीवनावर" विश्वास ठेवतो, आणि हा ही विश्वास ठेवतो की त्याच्या कर्मांचा मोबदला त्याला मिळणार आहे, याच विश्वासामुळे त्याला चांगले कार्य करण्यास प्रोत्साहन मिळते आणि दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे तो चांगले कर्म यासाठी करतो की त्याला त्याच्या निर्माणकर्त्याकडून बक्षिस (पुण्यांचा मोबदला) मिळावा, मंग त्याच्या चांगल्या कर्माला या जगाने मानावे किंवा न मानावे, त्याला सतकर्म करण्यास प्रोत्साहन दयावे अथवा न दयावे, या गोष्टीने त्याला काहीच फरक पडत नाही, तो नेहमीच सतकर्म करीत राहील .

काही लोक सतकर्म लोकांना दाखविण्या साठी करतात याचकरीता वेळ आल्यावर आपले केलेले चांगले कर्म लोकांना बोलून दाखवितात, केलेल्या उपकारांची जाणीव ते करून देतात आणि जर का लोक त्याची वाहवाह करीत नाही तर असे लोक सतकर्म करणे थांबवितात कारण ते लोकांना दाखविण्यासाठी सतकर्म करीत होते परंतू लोक त्या कर्माची स्तुती करीत नाही असे लक्षात येताच ते चांगले कर्म करणे थांबवितात .

## ३ . त्याग आणि बलिदानाची भावना

जर एखादा मनुष्य मृत्यु नंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाही . तर त्याची मानसिकता अशी असते की जे जीवन तो सध्या जगत आहे फक्त हेच जीवन सत्य आहे . जो काही उपभोग घ्यावयाचा आहे तो फक्त याच जीवनात आहे, या जगातील जीवनाच्या मृत्युनंतर पुन्हा जीवन मिळणे नाही, जेव्हां हे विचार त्याच्या मनात रूजवून जातात, तेव्हां तो या जगाच्या वस्तूंवर आगदी तूटुन पडतो, आणि आपल्या सगळया इच्छापुर्तीसाठी जे काही वाटेल ते करतो, मंग ते करण्यासाठी तो दुसऱ्यांवर अत्याचार सुध्दा करतो, दुसऱ्यांची मालमत्ता स्वःताच्या फायदया साठी चुकिच्या मार्गाने हिरावून घेतो, त्यांच्याकडून जबरदस्तीने पैश्याची वसूली देखील करतो, एवढेच नव्हे तर त्यांच्या जमीनीवर अवैध रितीने कब्जा करतो, अवैध व बेकायदेशीर धंदे करतो, स्वतःची ताकद वाढविण्याच्या गरजेने गुंडांना आपल्या जवळ करतो, समाजावर गुंडाराज प्रस्थापित करतो, एक रक्तपिणाऱ्या रक्तपिपासू प्रमाणे तो लोकांचे रक्त शोषून घेतो, अर्थात तो मनुष्य समाजासाठी मोठी समस्या बनतो .

या उलट अशा मनुष्याचे उदाहरण घेऊ जो मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवतो आणि अशा विचारां बरोबर जगतो की हे जीवन एक दिवस समाप्त होईल, माल मत्ता, ताकद सर्वकाही येथेच सोडून मृत्युला सामोरे जायचे आहे, या विचाराने त्याच्या मनात त्याग, बलिदान आणि सत्याने जीवन जगण्याची भावना उत्पन्न होते, व याचमुळे तो पैश्याच्या मागे जनावरसारखा धावत नाही, दुसऱ्यांच्या गरजांसाठी आपल्या गरजेला त्यागण्याची भावना त्याच्या मनात निर्माण होते किंबाहुना कधी तो दुसऱ्यांच्या गरज भागविण्यासाठी स्वतःचे

नुकसान करून घेतो, याच संदर्भात कुरआनमध्ये एक आयत आहे

**“ते दुसऱ्यांना स्वःतापेक्षा जास्त महत्व देतात.” (कुरआन सुरह हश्रः ९)**

अशा मनुष्यासाठी कोणत्याही वस्तूचे त्यागने किंवा बलिदान करने खूप सोपे असते कारण त्याचे लक्ष्य या ऐहिक जीवनावरती नसते तर कधीही न संपणाऱ्या मृत्युनंतरच्या जीवनावर असते.

## ४. लक्ष्यहीन जीवन

जीवनामध्ये ध्येय असणे फार गरजेचे आहे, लक्ष्यहीन जीवन हे जनावरा प्रमाणे असते, ज्या प्रमाणे एका प्राण्याला जीवन जगण्यासाठी काहीही ध्येय नसते त्याच्यासाठी जीवन जगणे म्हणजे फक्त इच्छपुर्ती होय, अगदी याचप्रमाणे लक्ष्यहीन मानवी जीवन म्हणजे इच्छपुर्तीचे जीवन होय, जेव्हा मनुष्य या अवस्थेमध्ये पोहचतो तेव्हा तो ना कोणा इतरांच्या मदतीसाठी कामी येऊ शकतो आणि ना त्याला स्वतःची काही काळजी असते जर का कमी वयाचा तरूण या अशा अवस्थेमध्ये पोहचला तर तो आपल्या जीवनामध्ये दारू आणि इतर नशावर गोष्टींच्या अधीन होतो मग तो जिवंत असून देखिल मृत्यु पेक्षाही वाईट जीवन जगत असतो, यामध्ये तो तरूण ना एक उत्तम पुत्र होऊ शकतो आणि ना एक चांगला पती होऊ शकतो या उलट तो स्वतःच कधीतर विवाहच करू इच्छित नाही व ना आपल्या कुटुंबाच्या काही कामी येतो उलट तो सर्व नातेवाइकांसाठी व स्वतःच्या कुटुंबासाठी व ऐवढेच नव्हे तर संपुर्ण समाजासाठी एक बोजा किंवा मानसिक तणावाचे कारण बनतो त्याला जीवन जगण्यामध्ये काहीही रूची नसते अशा अवस्थेत तो स्वतःच्या जीवनाचा अंत करू इच्छितो

आणि शेवट याच मानसिकतेमध्ये तो आपले जीवन नष्ट करून घेतो जरा विचार करा या अशा तरूणाचे जीवन कोणाच्या कामी आले? कशा प्रकारे एक मैल्यवान जीवन मैल्यहीन होऊन समाप्त झाले .

ज्या लोकांच्या जीवनामध्ये ध्येय असते आणि ते नेहमी आपल्या ध्येयाला समोर ठेवून जीवन जगतात आणि असे कोणतेही काम ते करीत नाही जे त्यांच्या ध्येयापासून त्यांना दूर घेऊन जाईल आशेच लोक आपल्या जीवनाला एक परीपुर्ण आकार देतात परंतू येथे एक दुसरी समस्या आहे जर हा व्यक्ती मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाही . तर स्वाभाविक आहे . की त्याचे ध्येय म्हणजेच उद्दिष्तपुर्ती ही या जगातील गोष्टींसाठी आहे . अशा परिस्थित दोन गोष्टी होऊ शकतात . एक तर हा मनुष्य आपल्या ध्येयला पुर्ण करू शकतो किंवा ध्येय पुर्ण करण्यामध्ये तो अयशस्वी ठरू शकतो जेव्हा तो आपल्या ध्येयाला पुर्ण करेल तेव्हा तो समाधानी होईल व त्याला उद्दिष्ट प्राप्ती झाल्यामुळे त्याच्यासमोर कोणतेही ध्येय नसेल अशा परिस्थितीत त्याचे जीवन पुन्हा लक्ष्यहीन होऊन जाईल आणि ध्येय प्राप्तीची चेतना, प्रेरणा जी त्याच्या जीवनामध्ये जीवन जगण्यासाठी रूची निर्माण करीत होती ती ध्येय प्राप्तीनंतर संपलेली असेल आणि त्याचे जीवन लक्ष्यहीन होऊन जाईल .

जे लोक अपल्या जीवनामध्ये उद्दिष्ट प्राप्ती करू शकत नाही आणि भविष्यामध्ये उद्दिष्ट प्राप्ती करण्याची आशा देखील गमाऊन बसतात तेव्हा ते एका निजीवाप्रमाणे जीवन जगत असतात किंवा आपल्या स्वतःला ते नशेच्या हवाली करतात .

मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास आणि या जगात केलेल्या कर्माचे फळ मिळण्याची आशा या दोन्ही

गोष्टी मनुष्याला जीवन जगण्यामध्ये कधीही निराशा येऊ देत नाही . आणि असे विचार असणाऱ्या लोकांचे मुख्य ध्येय आपल्या निर्माणकर्त्याची प्रसन्नता प्राप्त करणे हेच असते. हे एक असे ध्येय आहे जे मनुष्याच्या जीवनामध्ये नेहमी एक नवी आशा व उत्साह घेऊन येत असते, अशा मनुष्याचे जर या जगाच्या जीवनामध्ये काही ध्येय असेल तर ते ध्येय त्याला प्राप्त जरी नाही झाले तर त्याच्या जीवनामध्ये कोणतीही निराशा येत नाही आणि त्याचे जीवन कधीही लक्ष्यहीन जीवन बनत नाही .

## ५. जीवनामध्ये येणाऱ्या अडचणींना तोंड देण्याची शक्ती

जीवन हे समस्यांचे दुसरे नाव आहे, या जगामध्ये असा कोणीही नाही ज्याला कोणतीही समस्या नाही, जे लोक मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाही, त्यांच्यासाठी जीवनात येणाऱ्या अडचणीन बरोबर संघर्ष करणे खूप कठीण असते, मृत्युनंतर कोणतेही जीवन नाही, हे एकच जीवन आहे जे आपण सध्या जगत आहोत, आणि या एका जीवनामध्ये सर्व समस्या आणि अडचणी आहेत, या गणिताला ते लोक नाही समजू शकत जे अडचणी आल्यानंतर तक्रार करण्यास सुरूवात करतात की माझ्याच बरोबर असे का होते? परंतू जो व्यक्ती मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवतो त्याला माहिति असते की अडचण कितीही मोठी असो ती या जीवनाच्या समाप्ती बरोबरच नष्ट होऊन जाईल, आणि जीवनात अलेल्या अडचणींवर संयम ठेवून सत्यमार्गाने जीवन जगले व चुकीचा मार्ग पत्कारला नाही तर म्हणून माझा निर्माणकर्ता मला नक्किच याचा उत्तम मोबदला देइल, पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम म्हणतात की "एका मुसलमानावर (म्हणजेच आपल्या

निर्माणकर्त्याच्या अज्ञाधारकावर) जेव्हां कधी कोणतेही संकट येते (व त्यापासून त्याला जो त्रास होते व ज्या यातना त्याला पोहचतात तो त्रास व यातना) त्याच्या पापाचे प्रायश्चित बनते, मग त्याला फक्त एक काटा का टोचेना ."

जरा लक्ष दया एक क्षुल्लक काटा टोचल्यानंतर सुध्दा त्याला त्याच्या पालनकर्त्याकडून मोबदला मिळतो तर काय जी जीवनामध्ये मोठी मोठी संकटे येतात त्याच्या मोबदला नाही मिळणार का? होय, जरूर मिळेल पण हा विचार येतो की हा मोबदला त्याला कोठे मिळेल? तर त्याचे उत्तर आहे मृत्युनंतरच्या जीवनामध्ये! या जीवनाचा अंत जरूर आहे आणि त्याच बरोबर जीवनातील समस्यांचा अंत देखील आहे, परंतू मृत्युनंतरच्या जीवनाला अंत नाही जर हा विश्वास कोणाच्या ह्यदयात भक्कमपणे रूजेल तर त्याला जीवनातील संकटां बरोबर संघर्ष करणे सोपे होते, असा मनुष्य जीवनामध्ये कधीही हार मानत नाही .

## ६ . जगातील जीवनावर समाधान

या जगामध्ये प्रत्येकाची आपली एक जीवनशैली आहे . कोणाला निर्माणकर्त्याने धन दौलत दिली आहे . तर कोणी गरीब आहे . कोणाला बुध्दी जास्त दिली तर कोणाला कमी कोणाला काही गुण मिळाले . तर कोणाला नाही जर मृत्युनंतर जीवन नाही तर प्रत्येकाला ऐकामेकांबाबतीत तक्रार असेल गरीब श्रिमंताला पाहून स्वतःला तुच्छ समजेल आणि संकटामध्ये असलेला धनाढय माणूस गरीब माणसाचे तणावहीन व निश्चिंत जीवन पाहून स्वतःवरती खेद व्यक्त करेल, कमी बुध्दीवाले बुध्दीवंतांना पाहून स्वतःच्या जीवनावर दुःखी होतील, तात्पर्य हेच आहे की निर्मात्याच्या या वाटपा बद्दल प्रत्येकाला तक्रार असेल, परंतू जर का

मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास असेल तर त्याला जसे सुध्दा जीवन या जगात मिळाले असेल त्यावर तो समाधानी असेल .

त्याला हा विश्वास असेल की जीवन देणे हे त्याच्या स्वतःच्या हातात नाही परंतू या मिळालेल्या जीवनामध्ये पुण्यकर्म केले तर मृत्युनंतरचा जीवनामध्ये तो निश्चितच सुखी असेल, जीवना बद्दल हे समाधान मनुष्याला व्देष मत्सरापासून वाचवितो आणि जो व्यक्ती व्देष मत्सरापासून व कपटी भावनेपासून वाचला जातो अशा व्यकतीपासून इतर दुसऱ्या व्यक्तींना कधीही धोका नसतो, चोरी, लूट पाट व इतर दुष्ट कार्य कपटी भावनेमुळे होतात, मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास एक असे समाधान आहे जे मनुष्याच्या व्देष मत्साराला संपविते .

## समाप्ती

मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवणे मनुष्याची गरज आहे, हिच गोष्ट मनुष्याला सदाचारी बनविते, त्याच्या जीवनाला उद्दिष्ट प्राप्त करून देते, त्याच्यात त्याग व बलिदानाची भावना निर्माण करते, जीवनाच्या समस्या बरोबर लढण्याचे कौशल्य निर्माण करते, जीवनामध्ये उत्साह आणि आनंद देखील निर्माण करते, आणि जीवनाबद्दल त्याला समाधान प्राप्त होते तो व्देष मत्सरापासून वाचला जातो, मृत्युनंतरच्या जीवनावर अविश्वास असणे ही बाब मनुष्याला दुबळा बनविते या संसारामध्ये होणाऱ्या आत्याचारां बद्दल न्याय कोठे मिळेल या प्रश्नाचे कोणतेही उत्तर त्याच्याकडे नसते म्हणूनच का मानवजातीचे भले या मध्येच आहे की त्याने मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवावा .



आपल्या शरीर आणि आत्म्याच्या संपूर्ण मार्गदर्शनासाठी वाचा पवित्र कुरआन.

ज्यांना कुरआन वाचण्याची इच्छा आहे असे वाचकानी आपल्या भाषेत निःशुल्क पवित्र कुरआन मिळविण्यासाठी कॉल करा ही भेट सर्व जाती व धर्मियांसाठी उपलब्ध आहे. ऑर्डर करण्यासाठी फक्त हे करा.

- ✔ **१. नाव**
- ✔ **२. मोबाइल नंबर**
- ✔ **३. पत्ता**
- ✔ **४. कुरआनाची भाषा**

खालील फोन नंबर वर कॉल किंवा एस.एम.एस. करू शकता हे पवित्र कुरआन आपल्या घरी निःशुल्क मिळविण्या करीता त्वरीत कॉल करा.




www.albirr.in

अभी कॉल करें:

**Call for Mumbai**

**+91 8767 333555 / 9987 445522**

**Call for Pune**

**+91 9021259021 / 8484841847**

**Branches**

◆ Mumbai ◆ Mumbra ◆ Mira Road ◆
◆ Pune ◆ Mangaon (Kokan) ◆

**Email : freequran@albirr.in**